**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट -अ या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी या पदावर नियुक्ती झाल्यानंतर पदव्युत्तर पदवीका धारकास तीन वेतनवाढी व पदव्युत्तर पदवी धारकास सहा वेतनवाढी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्र.मवैअ-२०११/प्र.क्र.७७६/सेवा-३
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-१४ डिसेंबर, २०११.

**वाचा :-** शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्र. मवैअ-१२०६/१००४/ प्र.क्र.७३७/सेवा-३, दि. ३०.०५.२००७

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक आरोग्य विभागातील ग्रामीण रुग्णालये, उपजिल्हा रुग्णालये, जिल्हा रुग्णलाये, स्त्री रुग्णालये, मनोरुग्णालये व अति विशिष्ठ सेवा रुग्णालये या संस्थामंधून रुग्णांना आरोग्य सेवा देण्यासाठी त्या ठिकाणी बालरोग तज्ञ, स्त्रीरोग तज्ञ, भिषक, भुलतज्ञ, मानसोपचार तज्ञ, त्वचारोग तज्ञ, शल्य चिकित्सक, अस्थीव्यंगोपचार तज्ञ, क्ष-किरण तज्ञ, क्षयरोग तज्ञ, नेत्ररोग तज्ञ, नाक-कान-घसा तज्ञ, शल्य चिकित्सक, इत्यादी विशिष्ठ प्रकारच्या विशेषज्ञ वैद्यकीय अधिकाऱ्यांची आवश्यकता असते. उपरोक्त आरोग्य संस्थांमध्ये प्रत्येक प्रकारच्या विशेषज्ञांच्या आवश्यकतेसंबंधीचे निकष संदर्भीय शासन निर्णयान्वये विहित करण्यात आलेले आहेत. वरील निकष विहित करण्यात आले असले तरी, उपरोक्त आरोग्य संस्थामध्ये पदव्युत्तर पदवी / पदविका शैक्षणिक अर्हता धारण करणारे वैद्यकीय अधिकारी कमी प्रमाणामध्ये उपलब्ध असल्यामुळे रुग्णांना आवश्यक असणाऱ्या सेवा पुरविताना अडचण येत आहे. राज्यातील आरोग्य संस्थामध्ये विशेषज्ञांची असलेली कमतरता दूर करण्यासाठी विविध विषयातील पदव्युत्तर पदवी/ पदविका धारक उमेदवारांना वैद्यकीय अधिकारी पदावर आकर्षित करण्याच्या दृष्टीने प्रोत्साहनपर वेतनवाढी मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकारी (वेतनश्रेणी १५६००-३९१०० + ग्रेड पे ५४००) या पदावर नियुक्ती झाल्यानंतर पदव्युत्तर पदवीका धारकास तीन अतिरिक्त वेतनवाढी व पदव्युत्तर पदवी धारकास सहा अतिरिक्त

वेतनवाढी मंजूर करण्यात याव्यात. सदर शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून या प्रोत्साहनपर वेतनवाढी लागु करण्यात याव्यात.

सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं-४१०/सेवा-९, दि. ३०.०९.२०११ अन्वये प्राप्त सहमतीनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदरचे आदेश www.maharashtra.gov.in वर **साकेतांक क्र.** २०१११२१४०९५२२२००१ येथे प्रसिध्द करण्यात आले आहेत.

महाराष्ट्राचे राज्यापाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(ता.मा.कोळेकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
सहसंचालक (प्रशासन व अर्थसंकल्प), आरोग्य सेवा, मुंबई
उपसंचालक, आरोग्य सेवा, (सर्व परिमंडळे)
जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व जिल्हे)
जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, (सर्व जिल्हे)
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, (सर्व जिल्हे)
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१२), मंत्रालय, मुंबई -३२.
वित्त विभाग (कार्यासन सेवा-९), मंत्रालय, मुंबई -३२.
सार्वजनिक आरोग्य विभाग (कार्यासन सेवा-३ -नि.मं.), मंत्रालय, मुंबई-३२.
निवडनस्ती, सेवा-३